प्र.५

GR-2004/0081435601-1201

०ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या जिल्हा परिषदेच्या अखत्यारीतील लघु पाटबंधारे योजना कार्यान्वित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

परिपत्रक क्र.संकिर्ण १००२/प्र.क्र.३१०/जल-१

मंत्रालय,मुंबई ४०० ०३२

दिनांक :-२७ नोव्हेंबर, २००३.

वाचा:- १) ग्रा.वि. व ज.सं.वि. शासन निर्णय क्र. लपायो २००१/प्र.क्र.१०६/जल-१ दि. १ जानेवारी, २००२

२)ग्रा.वि.व ज.सं.वि. शासन परिपत्रक क्र. परास १००१/प्र.क्र.४०/जल-३ दि. १९.१०.२००१.

परिपत्रक:-

शासन पाटबंधारे प्रकल्प कार्यान्वित करताना त्यांचे सखोल सर्वेक्षण/अन्वेषण हे पाटबंधारे विभागाच्या मार्गदर्शक तत्वानुसार, तांत्रिक निकषाच्या आधीन राहून करण्यात येते. पाटबंधारे विभागाने अनुभवांती व मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना , नाशिक यांच्या तांत्रिक सल्ल्यानुसार को.प.बंधारे, पुलवजा को.प.बंधारे, ल.पा.तलाव, साठवण तलाव यांच्या संकल्पचित्राबाबत तांत्रिक मार्गदर्शक तत्वे निर्गमित केली आहेत. शासनाच्या प्रचलीत धोरणानुसार लघु पाटबंधारे योजना पाणी वापर संस्थांना हस्तांतरण करण्याबाबत शासन निर्णय दि. ३१ जुलै,२००० मध्ये निर्गमित केला. या शासन निर्णयानुसार पाणी वापर संस्थेच्या लाभधारक सभासदांची संख्या कमीत कमी ११ असणे आवश्यक आहे. या अनुषंगाने कार्यवाही करणे अपेक्षित आहे.

असे निदर्शनास आले आहे की, को.प.बंधा-या साठी जागा निवडताना पुरेशी खबरदारी न घेतल्याने बंधारे फुटणे, वाहून जाणे किंवा पाणी वापर योग्य प्रमाणात न होणे अशा घटना घडल्या आहेत. महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या पंचायत राज समितीसमोर झालेल्या साक्षीत समितीने वरील बाबी संदर्भात तीव्र नाराजी व्यक्त केली. याखेरीज असेही निदर्शनास आले आहे की, पूर्ण झालेल्या योजना पाणी वापर संस्थास व्यवस्थापनासाठी हस्तांतरीत केलेल्या नाहीत.

काही योजनांर्गत पाणी वापर संस्थेच्या लाभधारक सभासदांची संख्या ५ ते ६ एवढीच असून देखील त्या योजना कार्यान्वित करण्यात आल्या आहेत. योजनांचे सिंचन क्षेत्र ३० हेक्टर पेक्षा कमी असून अत्यल्प लाभधारक असताना देखील योजना कार्यान्वित करण्यात आल्या आहेत.

वरील वस्तुस्थितीच्या अनुषंगाने लहान योजनांच्या अंमलबजावणीबाबत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या बाबत खालील प्रमाणे निर्णय घेण्यास शासन मंजूरी देत आहे.

- ३० हेक्टर सिंचन क्षमतेपेक्षा कमी क्षमतेच्या ल.पा.योजना (साठवण बंधारे,वळवणीचे बंधारे,को.प.बं. व लघु पाटबंधारे योजना) कार्यान्वित करण्यात येऊ नयेत.
- लाभधारकांच्या पाणी वापर संस्थेतील सभासदांची संख्या कमीत कमी ११ असल्याखेरीज त्या क्षेत्रात योजना कार्यान्वित करण्यात येऊ नये.
- अपवादात्मक परिस्थितीत ३० हेक्टर पेक्षा कमी सिंचन क्षमतेच्या योजना, खालील अटींच्या आधीन राहून कार्यान्वित करण्यात याव्यात.
  - अ) २० हेक्टर सिंचन क्षमतेपेक्षा कमी सिंचन क्षमता नसावी.
  - ब) लाभधारकांच्या पाणी वापर संस्थेतील सभासदांची संख्या ११ पेक्षा कमी असू नये.
  - क) अशा योजनांना शासनाची मान्यता घेणे आवश्यक आहे.

सदरचे परिपत्रक प्रधान सचिव,(ग्रा.वि.वि.)च्या अनौपचारीक संदर्भ क्र.६०७१, दि. १९.११.२००३ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

( आय.एम.मोरे )
शासनाचे उपसचिव

प्रति :
मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई.
प्रधान सचिव (वित्त) ,वित्त विभाग
प्रधान सचिव (वित्त) व्यय ,वित्त विभाग
प्रधान सचिव (नियोजन) ,नियोजन विभाग
मा.सचिव म.वि.प.(पंचायत राज समिती ) विधान भवन,मुंबई (समिती)
सचिव (पा.वि.), पाटबंधारे विभाग
सचिव (ला.क्षे.वि.), पाटबंधारे विभाग
सचिव (ग्रामविकास विभाग)
सचिव (जलसंधारण)
मुख्य अभियंता , ल.पा., (स्थानिक स्तर) पुणे
अधीक्षक अभियंता ल.पा.(स्था.स्तर) मंडळ, पुणे / ठाणे /नाशिक /औरंगाबाद/ अमरावती/नागपूर
कार्यकारी अभियंता , ल.पा.(स्था.स्तर) विभाग ,सर्व.
कार्यकारी अभियंता , ल.पा. (जिल्हा परिषद) विभाग, सर्व.